**राज्यातील महानगरपालिका/ नगरपरिषदा / नगरपंचायतींमधील पात्र अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या वारसास अनुकंपा नियुक्ती योजनेसंदर्भातील सुधारित शासन निर्णय लागू करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१७/प्र.क्र.२२(भाग-१)/नवि-१४,**
मंत्रालय, मुख्य इमारत (४ था मजला),
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक २५ एप्रिल, २०२२.

**संदर्भ**:- १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.अकंपा-१२१७/प्र.क्र.१०२/आठ, दि.२१.०९.२०१७.
२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१९/प्र.क्र.११७/नवि-१४, दि.११.०७.२०१९.
३. नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचे क्र.नपप्रसं/औरंगाबाद विभाग/वारसा हक्क प्रकरण एकत्रित नस्ती/प्र.क्र.११४-२०२०/का-४/१८९९, दि.१६.०६.२०२१ चा प्रस्ताव.

**प्रस्तावना**:-

संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील महानगरपालिका/ नगरपरिषदा / नगरपंचायतींमधील पात्र अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या वारसास अनुकंपा नियुक्ती योजनेसंदर्भातील सामान्य प्रशासन विभागाचा संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय योग्य त्या फेरफार/ सुधारणेसह लागू करण्यात आला आहे.

अनुकंपा नियुक्ती योजनेचा लाभ तत्कालीन ग्रामपंचायतींमधील कार्यरत पात्र कर्मचारी विहीत अर्हता धारण करत असताना व मंजूर पद उपलब्ध असताना केवळ समावेशन प्रक्रिया पूर्ण न झाल्याने/ प्रशासकीय कारणामुळे नवनिर्मित नगरपरिषदा/ नगरपंचायतींमध्ये समावेशन होण्यापूर्वी मयत झाला असल्यास त्याच्या पात्र वारसास देण्याबाबत धोरणात्मक निर्णयाच्या अनुषंगाने नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने प्रस्ताव सादर केला होता.

या संदर्भात नगरपरिषद प्रशासन संचालनालयाचा प्रस्ताव तसेच वस्तुस्थिती विचारात घेऊन संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे

**शासन निर्णय**:-

राज्यातील महानगरपालिका/ नगरपरिषदा / नगरपंचायतींमधील पात्र अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या वारसास अनुकंपा नियुक्ती योजना लागू करण्याबाबतच्या संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२ (अ) येथील अनुकंपा योजनेचा लाभ लागू असणाऱ्या कर्मचाऱ्यांमध्ये अ.क्र.५ नंतर खालीलप्रमाणे तरतूद अ.क्र.६ म्हणून समाविष्ट करण्यात येत आहे:-

तत्कालीन ग्रामपंचायतींमधील कार्यरत विहीत अर्हता धारणारे व मंजूर पद उपलब्ध असताना केवळ समावेशन प्रक्रिया पूर्ण न झाल्याने/ प्रशासकीय कारणामुळे नवनिर्मित नगरपरिषदा/ नगरपंचायतींमध्ये समावेशन होण्यापूर्वी मयत झालेले पात्र कर्मचारी.

२. सदर नुसार समावेशन न झालेल्या कर्मचाऱ्याच्या पात्र वारसास अनुकंपा नियुक्ती देताना, दिवंगत कर्मचारी समावेशनास पात्र असताना, संबंधित प्रकारचे पद मंजूर असताना केवळ प्रशासकीय बाबीमुळे त्याचे समावेशन झाले नसल्याचे संबंधित मुख्याधिकाऱ्यांनी अभिलेखावरुन प्रमाणित करणे आवश्यक आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२५१७२५०४३३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SACHIN DATTATRAY SAHASRABUDDHE

Digitally signed by SACHIN DATTATRAY SAHASRABUDDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7db996f7c088dbf2d76ad85484362957aab596e46ec268eca3b9822aa62fd32b, pseudonym=0A2F599A7118DE7D0584BC29092414A732A5CDB4, serialNumber=67648AD8C40ECF8D0F911EAF72D918202F02F540836A5F65E8B71C0A69D61291, cn=SACHIN DATTATRAY SAHASRABUDDHE
Date: 2022.04.26 10:02:44 +05'30'

**(सचिन द. सहस्त्रबुध्दे)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत: -**

१. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई.
२. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
३. मा.विधानसभा/ मा.विधानपरिषद, सदस्य (सर्व)
४. मा.राज्यपाल महोदयांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
५. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव महोदयांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.मंत्री(नगर विकास)महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा.राज्यमंत्री (नगर विकास) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१२. विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक (सर्व)
१३. जिल्हाधिकारी (सर्व)
१४. सह/ उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. सर्व मुख्याधिकारी (नगरपरिषदा व नगरपंचायती)
१६. निवडनस्ती (नवि-१४)